वनक्षेत्रात मेंढीचराई संदर्भात उदभवत असलेल्या अडचणीबाबत तोडगा काढण्याच्या दृष्टीने प्रायोगिक तत्वावर बुलढाणा व जळगाव जिल्हयात पावसाळयात चराईकरीता परवानगी देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एमएफपी-२१०३/प्र.क्र.१३५/फ-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०२ जानेवारी, २०१७

वाचावे-

१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- एमएफपी-१३६५/१३२२११-वाय, दिनांक ०६ डिसेंबर, १९६८.
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- एमएफपी-१३६९/६३६९५-झेड, दिनांक ०२ ऑगस्ट, १९७१.
३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- एमएफपी-१३७१/२३७०३५-झेड, दिनांक ०३ नोव्हेंबर, १९७३.
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- एमएफपी-२१०३/प्र.क्र.१३५/फ-१, दिनांक २३ डिसेंबर, २००३.
५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- एमएफपी-२१०३/प्र.क्र.१३५/फ-१, दिनांक २१ मार्च, २००५.
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- एमएफपी-२१०३/प्र.क्र.१३५/फ-१, दिनांक ०६ मे, २००८.
७) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- एमएफपी-२१०३/प्र.क्र.१३५/फ-१, दिनांक ०२ सप्टेंबर, २०१५.
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) यांचेकडील पत्र क्रमांक कक्ष-१६/आर-३/मे.च.बै./ प्र.क्र. ४५ (२०१५-१६)/जी-१०, दिनांक २८ एप्रिल २०१६.

**प्रस्तावना: -**

**१.** संदर्भ क्रमांक १ अन्वये राज्यात वनक्षेत्रात गुरेचराई संदर्भात धोरण निश्चित करण्यात आले आहे. संदर्भ क्रमांक २ अनुसार गुरांना वनक्षेत्रात चराई परवाना देण्यासाठी प्राधान्यक्रम निश्चित करण्यात आलेला आहे. त्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक ३ अनुसार वनक्षेत्रात गुरेचराई संदर्भात नियमावलीस मान्यता देण्यांत आली आहे.

**२.** मेंढीपालन हा मेंढपाळ कुटुबांचा परंपरागत व्यवसाय आहे. तथापि, संदर्भ क्रमांक २ मधील शासन निर्णयानुसार ठरविण्यात आलेल्या प्राधान्यक्रमात मेंढीचा विशिष्टपणे उल्लेख नाही. राज्यात वनक्षेत्राची व्याप्ती एकूण भौगोलिक क्षेत्राच्या सुमारे २० टक्के इतकी आहे. त्यातही वनक्षेत्राचे प्रमाण सम-समान नाही. बहुतांश वनक्षेत्र एकट्या नागपूर महसूल विभागात (गडचिरोली व चंद्रपूर) आहे. औरंगाबाद महसूल विभागात वनक्षेत्र कमी आहे. अमरावती महसूल विभागात उपलब्ध वनक्षेत्रापैकी जवळ-जवळ एक तृतियांशपेक्षा जास्त वनक्षेत्र अभयारण्य व राष्ट्रीय उद्यानात अंतर्भूत असून त्यात चराईवर निर्बंध आहेत. वर नमूद केल्याप्रमाणे राज्यात बहुतांश ठिकाणी चराईसाठी मागणी इतके क्षेत्र उपलब्ध नाही. उपलब्ध वनक्षेत्रात गुरांच्या ठरविलेल्या प्राधान्यक्रमानुसार चराई परवाने दिले जातात.

**३.** प्रचलित शासन धोरणानुसार व वन व्यवस्थापनासंदर्भात शास्त्रोक्त तत्वदृष्टी विचारात घेऊन वनक्षेत्रात मेंढीचराईशी निगडीत समस्यांवर तोडगा काढण्यासाठी संदर्भीय शासन निर्णय क्रमांक ४ व ५ अन्वये राज्यात प्रत्येक वन विभागासाठी सहाय्यक वनसंरक्षक दर्जाच्या अधिकाऱ्यांची चराई जमाबंदी अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात आली. उक्त सर्व चराई जमाबंदी अधिका-यांकडून प्राप्त झालेल्या

अहवालांना संदर्भ क्रमांक ६ येथील शासन निर्णयानुसार औपचारिक मान्यता प्रदान करण्यात आली. त्यानुसार राज्यात त्यावेळेस असलेल्या एकूण ४८ वन विभागांपैकी २७ वन विभागांमध्ये मेंढीचराईस क्षेत्र उपलब्ध नसल्याबाबत आणि २१ वन विभागात उपलब्धतेनुसार काही प्रमाणात चराई क्षेत्र उपलब्ध असल्याचा उल्लेख सदर शासन निर्णयात करण्यात आला आहे. मेंढीचराईकरीता उपलब्ध असलेल्या आणि उपलब्ध नसलेल्या विभागांचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

**३.१. मेंढी चराईसाठी वनक्षेत्र उपलब्ध असलेले वन विभाग (एकूण-२१)** :-

बुलडाणा, वर्धा, भंडारा, नागपूर, गोंदिया, औरंगाबाद, नांदेड, पश्चिम धुळे (धुळे), उत्तर धुळे (नंदूरबार), सिरोंचा, आलापल्ली, मध्य चांदा, गडचिरोली, वडसा, चंद्रपूर, सावंतवाडी, सातारा, कोल्हापूर, अकोला, सांगली आणि पुसद अशा २१ वन विभागात काही प्रमाणात वनक्षेत्र उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

**३.२. मेंढी चराईसाठी वनक्षेत्र उपलब्ध नसलेले वन विभाग (एकूण-२७) :-**

अमरावती, पूर्व मेळघाट, पश्चिम मेळघाट, उस्मानाबाद, बीड, परभणी, अहमदनगर, पूर्व नाशिक, पश्चिम नाशिक, सोलापूर, भोर, पुणे, जुन्नर, ठाणे, जव्हार, शहापूर, रोहा, अलीबाग, डहाणू, मेवासी, यावल, जळगांव, भामरागड, ब्रम्हपूरी, चिपळूण, यवतमाळ, पांढरकवडा अशा २७ वन विभागात वनक्षेत्र उपलब्ध करुन देण्यात आले नाही.

४. तथापि, उक्त शासन निर्णयात असेही नमूद आहे की, मुंबई वन संहिता, खंड-३ नुसार मेंढी चराईकरीता परवाने देण्याचा कालावधी १५ सप्टेंबर ते १५ मे दरम्यान राहील. वनाचे अस्तित्व कायम ठेवण्याच्या दृष्टीने वनक्षेत्रातील नैसर्गिक पुनर्निर्मिती अबाधित ठेवणे क्रमप्राप्त आहे. त्यासाठी जून ते सप्टेंबर या कालावधीत मेंढी चराईबाबत परवानगी देता येत नसल्याने या कालावधीत वन क्षेत्रात चराईस परवानगी देण्याबाबतच्या मेंढपाळांच्या मागणीचे समाधान वन विभागाकडून होत नाही.

५. मेंढपाळांकडून वेळोवेळी प्राप्त होणा-या निवेदनांवर विचार करुन महाराष्ट्र राज्यात मेंढीचराईबाबत उपलब्ध असलेल्या आणि नसलेल्या वन विभागांच्या क्षेत्राबाबत अभ्यास करण्यासाठी संदर्भ क्रमांक ७ येथील शासन निर्णयानुसार खालीलप्रमाणे एक अभ्यास समिती गठीत करण्यात आली:-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), म.रा.नागपूर | अध्यक्ष |
| २. | मा. श्री. गणपतराव देशमुख, विधानसभा सदस्य | सदस्य |
| ३. | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संसाधन उपयोग), म.रा. नागपूर | सदस्य |
| ४. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), धुळे | सदस्य |
| ५. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नाशिक | सदस्य |
| ६. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती | सदस्य सचिव |
| ७. | श्री. लहूजी शेवाळे, औरंगाबाद | सदस्य |
| ८. | डॉ. विकास महात्मे, महात्मे आय बँक आय हॉस्पिटल, नागपूर | सदस्य |

६. उक्त शासन निर्णयान्वये समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे ठरविण्यात आली :-

६.१ महाराष्ट्र राज्यातील वनक्षेत्रातील गुरे चराई नियमावली तसेच मेंढी चराई जमाबंदी अहवालाचे पुनर्निरीक्षण करणे.

६.२ महाराष्ट्र राज्यालगतच्या राज्यातील उदा. कर्नाटक, मध्य प्रदेश, छत्तीसगढ, तेलंगणा इ. राज्यात मेंढी चराईबाबत धोरण, नियम, तरतूदींचा अभ्यास करणे.

६.३ महाराष्ट्र राज्यात जून ते सप्टेंबर या कालावधीत चराईसाठी वन क्षेत्रावर अवलंबून असणा-या मेंढयांची जिल्हानिहाय संख्या तसेच उपलब्ध वनक्षेत्राची चराई क्षमतेचा विचार करुन उक्त कालावधीत मेंढीचराईसाठी वन क्षेत्र उपलब्ध करता येईल किंवा कसे, याबाबत अभ्यास करणे.

६.४ वनक्षेत्राबाहेर उपलब्ध पडीक जमिनीवर मेंढी चराईसाठी पोषक स्थिती तयार करण्याबाबत अभ्यास करणे.

**७.** उक्त शासन निर्णयाच्या अनुषंगाने अभ्यास समितीने राज्यातील विविध भागात असलेल्या मेंढपाळांचे प्रतिनिधी व मेंढीचराईकरीता वनावर निर्भर असणा-या लोकांना तसेच मेंढपाळ व धनगर समाजाच्या प्रतिनिधींना त्यांचे म्हणणे मांडण्याची संधी देऊन तसेच त्यांच्या अडीअडचणी व मत जाणून घेतले. अभ्यास समितीने महाराष्ट्र व लगतच्या मध्य प्रदेश, छत्तीसगढ, कर्नाटक, तेलंगणा व आंध्र प्रदेश या राज्यांतील वनक्षेत्रात गुरेचराईबाबत धोरणाचा सखोल अभ्यास केला. अभ्यास समितीने महाराष्ट्र राज्यात गुरांचे प्रकार, संख्या, इत्यादीचे आकलन करण्यासाठी पशुसंवर्धन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून प्रसिध्द झालेल्या १९ व्या पशुगणनेतील आकडेवारीचा आधार घेतला व या सर्व बाबींबाबत सर्वकष विश्लेषण करुन दिनांक २८.०३.२०१६ रोजी शासनास अहवाल सादर केला.

८. उक्त अभ्यास समितीने सादर केलेला अहवाल व त्यावर संदर्भ क्रमांक ८ नुसार प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेल्या तांत्रिक अभिप्रायाचा साकल्याने विचार करुन वनक्षेत्रात मेंढीचराई संदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

**९. अनुज्ञेयता, चराईकरीता परवाना कालावधी, शुल्क व प्राधान्यक्रम**

जून ते सप्टेंबर हा कालावधी नैसर्गिक पुनर्निमितीचा कालावधी असल्याने वनाचे शास्त्रोक्त व्यवस्थापन व वनांचे अस्तित्व चिरस्थाई टिकविण्याच्या दृष्टीने चराईकरीता परवानगी देणे संयुक्तिक नसल्याने शासन निर्णय दिनांक ०६/०५/२००८ मधील तरतुदीप्रमाणे मेंढी चराई कालावधी १५ सप्टेंबर ते १५ मेपर्यंत निश्चित करण्यात आला आहे. तथापि मेंढपाळांना जून ते सप्टेंबर ह्याच कालावधीत मेंढी चराईकरीता क्षेत्र उपलब्ध नसल्याने प्रायोगिक तत्वावर दोन वर्षांच्या काळासाठी (सन २०१७ व २०१८) दिनांक १ जून ते ३० सप्टेंबर या कालावधीत बुलढाणा व जळगाव जिल्ह्यातील खालील तपशीलानुसार ३००० पेक्षा जास्त मेंढी संख्या असलेल्या तालुक्यांसाठी वनक्षेत्रात (वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ अंतर्गत घोषित संरक्षित क्षेत्र वगळून) मेंढी चराई परवाने अनुज्ञेय राहतील.

| अ. क्र. | जिल्हा | तालुका | पशुसंवर्धन आयुक्तालयामार्फत झालेल्या १९ व्या पशुगणना अहवालानुसार मेंढ्यांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | जळगाव | चाळीसगाव | १२,१९९ |
| | | मुक्ताईनगर | १६,१९९ |
| २ | बुलढाणा | बुलढाणा | ३,३५७ |
| | | चिखली | ६,४०८ |
| | | खामगाव | ४७,९८२ |
| | | मोताळा | ३५,७३९ |
| | | सिंदखेडराजा | ३,५०१ |

१०. बुलढाणा व जळगाव जिल्ह्यातील ज्या तालुक्यातील मेंढ्यांची संख्या ३००० पेक्षा कमी आहे, त्या तालुक्यातील वनेत्तर क्षेत्र मेंढीचराईकरीता पुरेसे राहील. सबब अशा तालुक्यात पावसाळ्यात मेंढीचराई परवाने अनुज्ञेय ठरणार नाहीत.

११. चराई परवाने फक्त उदरनिर्वाहासाठी (Livelihood) मेंढीचराईवर निर्भर मेंढपाळांना अनुज्ञेय राहतील. वाणिज्यिक (Commercial) तत्वावर मेंढी चारणा-यांना परवाने अनुज्ञेय राहणार नाहीत.

१२. वनक्षेत्रात मेंढीचराई परवाने मंजूर करतांना संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयामधील निर्धारित केलेला खालील प्राधान्यक्रम पाळला जाईल. तथापि प्रथम येणाऱ्यास प्रथम मिळेल (first come first serve) या तत्वावर मेंढी चराई परवाने उपलब्ध करण्यात यावेत. तसेच हे करताना समन्यायी वाटप (equitable distribution) या तत्वाचे काटेकोरपणे पालन करावे.

i. Plough cattle and milch cattle of cultivators subject to the maximum of ४ cattle units.
ii. Additional plough cattle and milch cattle, if any, of cultivators subject to maximum of ४ cattle units.
iii. Milch cattle of non-cultivators subject to the maximum of ४ cattle units.
iv. Remaining essential cattle including milch cattle of cultivators.
v. Milch cattle of non-cultivators and non-essential cattle of cultivators.
vi. Non-milch cattle of non-cultivators.
vii. Cattle from non-listed villages.

ESSENTIAL CATTLE :

| | | |
|---|---|---|
| A. Milch Cattle | : | All cattle actually yielding milk will be considered as milch cattle. |
| B. Agricultural Cattle | : | Will include up to ४ cattle units per "plough" (Agriculturist having upto २० acres cultivable land is considered to have one "plough". |

१३. अपवादात्मक परिस्थितीत चराई क्षमतेच्या अधिन राहून व दिनांक २ ऑगस्ट १९७१ च्या शासन निर्णयातील प्राधान्यक्रम पाहून लगतच्या तालूक्यातील चराईक्षेत्र मेंढयांकरिता उपलब्ध करुन देता येईल.

१४. मेंढीचराईकरीता उपलब्ध क्षेत्राचे आकलन करण्याप्रयोजनार्थ मेंढी हयास १ गुरे घटक (One Cattle unit) असे गृहीत धरण्यात यावे. मेंढीकरीता चराई परवाना शुल्क रु ५/-प्रति मेंढी या दराने आकारण्यात यावे.

१५. परिच्छेद ९ मधील तक्त्यात दिलेल्या क्षेत्राव्यतिरीक्त राज्यातील उर्वरीत क्षेत्राकरीता वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ अंतर्गत घोषित संरक्षित क्षेत्र (Protected Areas) वगळून संदर्भ क्रमांक ६ मधील शासन निर्णयातील इतर तरतूदी कायम राहतील.

१६. उक्त शासन निर्णयाच्या अनुषंगाने बुलढाणा व जळगाव जिल्ह्यामध्ये सन २०१७ व २०१८ मध्ये मेंढी चराईसाठी देण्यात आलेले परवाने व मेंढी चराईमुळे निदर्शनास असलेले अनूकूल / प्रतिकूल परिणाम याबाबत मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) अमरावती/ धुळे ह्यांनी अभ्यास करावा व अहवाल प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर ह्यांना सादर करावा. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे चिकीत्सात्मक अभिप्रायासह त्यांचा अहवाल दिनांक ३०.११.२०१८ पर्यत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०१०३१७२७४५७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.01.03 17:31:57 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सह सचिव (वने)

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजीक वनीकरण, पुणे
४. व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम. लिमिटेड, नागपूर
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
७. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), (सर्व)
८. मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) व क्षेत्र संचालक, व्याघ्र प्रकल्प (सर्व)
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०. वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव), (सर्व)
११. पशुसंवर्धन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. जिल्हाधिकारी, (सर्व)
१३. उपवनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव), (सर्व)
१४. विभागीय वन अधिकारी/उप विभागीय वन अधिकारी, (सर्व)
१५. फ-१, कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई/निवड नस्ती.

******